सन २०२२-२३ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या राज्य योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. बैठक-२०२२/प्र.क्र.१६३/भाग-३/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२३

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४ एप्रिल, २०२२
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१०२/फ-९, दि.०३.०६.२०२२
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१०२/फ-९, दि.०२.०८.२०२२
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१११/फ-९, दि.२९.०८.२०२२
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१११/फ-९, दि.१८.१०.२०२२
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२२/प्र.क्र.४६/फ-११, दि.११.०७.२०२२
७. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२२/प्र.क्र.६२/फ-११, दि.२६.०८.२०२२
८. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१११/फ-९, दि.०४.११.२०२२
९. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२२/प्र.क्र.४६/फ-११, दि.९.११.२०२२
१०. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२२/प्र.क्र.६२/फ-११, दि.१४.११.२०२२
११. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.१६३/फ-९, दि.१६.११.२०२२
१२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.१६३/फ-९, दि.१८.११.२०२२
१३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.१६३/फ-९, दि.३१.०१.२०२३
१४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.१६३/फ-९, दि.३१.०१.२०२३
१५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.१६३/फ-९, दि.१०.०३.२०२३
१६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०८ फेब्रुवारी,२०२३
१७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. १६ मार्च,२०२३
१८. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बैठक-२०२२/प्र.क्र.१६३/भाग-२/फ-९, दि.२९.०३.२०२३
१९. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.०७/७९४/२०२२-२३, दिनांक २७.०२.२०२३
२०. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.०७/८२५/२०२२-२३, दिनांक ०६.०३.२०२३
२१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२/यो/प्र.क्र.१४२-२ संजय गांधी/२२-२३/८४९, दिनांक २७.०२.२०२३
२२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३८ (१ ते ६)/फ-९, दि.२९.०३.२०२३

**प्रस्तावना :-**

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात सुधारीत अंदाजानुसार निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ९४९४.१४ लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. संदर्भ क्र.२ ते १५ व १८ च्या विविध शासन निर्णयान्वये एकूण रु.७५२४.८७१ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१७, चे परिपत्रकान्वये सन २०२२-२३ चे सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात आली असून, अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत तरतूदींचा उर्वरित संपूर्ण

निधी एकत्रितरित्या १००% बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित ५०-इतर खर्च, ५३-मोठी बांधकामे, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) व इतर उद्दिष्टाकरीता नियोजन विभाग, सामाजिक न्याय विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची मान्यता घेण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत.

सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.१९ ते २१ रोजीचे पत्रान्वये प्राप्त झालेले चालू बाब प्रस्ताव तसेच संदर्भ क्र.२२ अन्वये प्रशासकीय मान्यता प्राप्त प्रस्तावास अनुदान उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर यानी संदर्भ क्र.१९ ते २१ नुसार सादर केलेले प्रस्ताव व वित्त विभागाचे संदर्भ क्र.२१ येथील परिपत्रक विचारात घेता, प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या योजनेमधून सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात खालील तक्त्यात नमूद केलेल्या निसर्ग पर्यटन स्थळाना **०२-मजूरी अंतर्गत रु.३५५.५४४ लक्ष , २१-साहित्य व पुरवठा अंतर्गत रु.३५.७४२ लक्ष, २७-लहान बांधकामे अंतर्गत रु.१२.३८६ व ५०-इतर खर्च अंतर्गत रु.८३९.३५८ असे एकूण रु.१२४३.०३ लक्ष इतका निधी** खालील अटींच्या अधिन राहून वितरीत व खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

**(रु.लाखात)**

| **अ. क्र.** | **निसर्ग पर्यटन स्थळाचे नाव** | **प्रपत्र ब मधील कामे** | **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम** |
|---|---|---|---|
| १ | मौजे ऐरोली येथील कांदळवन | अनु.क्र.१<br>प्रकल्प सल्लागार यांना देय रक्कम | **६.१९** |
| २ | मौजे पाचगांव पर्वती तळजाई वनउद्यान स.नं.१ | अनु.क्र.१ ते २७ मधील आवश्यक कामे | **१५०.००** |
| ३ | मौजे बावधन वन उद्यान सर्वे नं.०३ | अनु.क्र.१ ते १७ मधील आवश्यक कामे | **१००.००** |
| ४ | मौजे रिसनगांव ता.लोहा, जि.नांदेड | अनु.क्र.१ ते ४ मधील<br>(सन २०१९-२० ते<br>२०२२-२३) | **७७.३७** |
| ५ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान बोरिवली | अनु.क्र.<br>मीनि ट्रेन अद्यावत करण्यासाठी<br>RITES योचे मानधन | **११.७** |
| ६ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान बोरिवली | लायन गेट व recreation झोन मधील कामे प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३८(१ ते ६)/फ-९, दिनांक २१.०३.२०२३ | **८९७.७७** |
| | | **एकूण :-** | **१२४३.०३** |

**<u>अटी व शर्ती:-</u>**

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

४. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

५. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.

७. सदर आर्थिक वर्ष २०२२-२३ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

८. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

९. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

१०. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

११. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०४.०४.२०२२,०८.०२.२०२३ व १६.०३.२०२३ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१२. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी-२०११/प्र.क्र.१७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

१३. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूदी तसेच प्रचलित कायदे व नियम मधील तरतूदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१४. कामांची अंमलबजावणी करताना कामांचे एकत्रीकरण करुन नियमानुसार ई-निविदा प्रणाली अवलंबण्याची दक्षता घ्यावी.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक-सी-०७ प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९५/१४७५, दिनांक २७.०३.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६२/व्यय-१०, दिनांक २९.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीने व वित्त विभागाच्या दिनांक १६.०३.२०२३ चे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११२२११५२५६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=cd9b7c852f06815dc15baee9beaa952cb59250169fcb3d489150789e0cc31ca6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6025E577A0EE54FAED5D6081093A5E1F8E2B15125A14DDE66E1EA3AFA9BC2CF5, cn=PINGALE BHANUDAS NARAYAN
Date: 2023.04.05 16:21:33 +05'30'

**( भा. ना. पिंगळे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे
७. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), औरंगाबाद
८. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
९. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
१०. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)